नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अस्थायी-२९२३/प्र.क्र.११६/ना.पु.१५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०३ एप्रिल, २०२३.

**वाचा :-**

१) विभागाचा शा.नि.क्र.संकीर्ण-१०१७/प्र.क्र.१५६/ना.पु.१२, दिनांक १८.०४.२०२२,
२) विभागाचा शासन निर्णय क्र.पदनि-११२२/प्र.क्र.१८७/ना.पु.१५, दि.२५/८/२०२२.
३) विभागाचा शासन निर्णय क्र.अस्थायी-२९२२/प्र.क्र.२६१/ना.पु.१५,दि.१७.१०.२०२२,
४) वित्त विभाग शा.नि.क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०८/०२/२०२३.
५) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र.निशि/आस्था/२०२३/रजा-४ड/जा.क्र.८१, दिनांक २७/०३/२०२३.

**प्रस्तावना :**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील पदांचा आढावा घेवून संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आलेला आहे. या आकृतीबंधानुसार दिनांक २५ ऑगस्ट, २०२२ च्या शासन निर्णयान्वये नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा यांच्या आस्थापनेवरील शिधावाटप यंत्रणेसाठी एकूण नियमित ११२८ पदे व बाहयस्त्रोताद्वारे २६३ पदे यांची कार्यालय निहाय पदसंख्या निश्चित करण्यात आली आहे. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अंशकालीन सफाईगार संवर्गातील ४४ व अंशकालीन मेहेतर संवर्गातील ४६ अशा एकूण ९० अस्थायी पदांना संदर्भ क्र.०३ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०९/२०२२ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. शासनाच्या दिनांक १८/०४/२०२२ रोजीच्या सुधारित आकृतीबंधाच्या शासन निर्णयानुसार नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयांतील अंशकालीन सफाईगार व अंशकालीन मेहेतर संवर्ग मृत संवर्ग म्हणून घोषित केलेला आहे.

संदर्भ क्र. ४ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०२३ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान केले आहेत. त्यानुसार नियंत्रक शिधावाटप, मुंबई कार्यालयातील या संवर्गातील सध्या ९० अस्थायी पदे कार्यरत असून सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयासाठी अंशकालीन सफाईगार संवर्गातील ४४ व अंशकालीन मेहेतर संवर्गातील ४६ अशा एकूण ९० पदांची आवश्यकता विचारात घेवून,

सदर पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीपासून रिक्त नाहीत या अटीच्या अधीन राहून दिनांक १ मार्च, २०२३ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. या ९० अस्थायी पदांची संवर्गनिहाय पदसंख्या पुढील तक्त्यात दर्शविण्यात आलेली आहे.

| **अ. क्र.** | **जिल्हयाचे नाव** | **पदाचे नाव** | **पदांची संख्या** | **सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मुदतवाढ द्यावयाची अस्थायी पदे** | **सुधारित आकृतीबंधाचा शासन निर्णय दिनांक** |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुंबई /ठाणे शिधावाटप क्षेत्र | सफाई कामगार (अंशकालीन) | ४४ | प्रधान कार्यालय-३<br>अ परिमंडळ-१४<br>ड परिमंडळ-५<br>ई परिमंडळ-८<br>फ परिमंडळ-११<br>ग परिमंडळ-३ | क्र.संकीर्ण १०१७/ प्र.क्र.१५६/ना.पु.१२ दि.१८/४/२०२२ |
| २ | मुंबई /ठाणे शिधावाटप क्षेत्र | मेहेतर (अंशकालीन) | ४६ | प्रधान कार्यालय-२<br>अ परिमंडळ-१४<br>ड परिमंडळ-७<br>ई परिमंडळ-९<br>फ परिमंडळ-१०<br>ग परिमंडळ-४ | |
| | | **एकूण** | ९० | | |

३. उपरोक्त अस्थायी पदांवरील खर्च संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व तो "मागणी क्र.एम-२, २४०८-अन्न साठवण व वखार साठवण, १०१ प्रापण व पुरवठा, (०२) शिधावाटप (०२) (०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र, दत्तमत (२४०८००६४) ०२, मजूरी " या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक वित्त विभाग शा.नि.क्र.पदनि-२०१६/ प्र.क्र.८/ १६/आ.पु.क.,दि.०८/०२/२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४०३१७४०४९८७०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2023.04.03 17:46:33 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा मुंबई,

२) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,

३) महालेखापाल महाराष्ट्र-१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

४) महालेखापाल महाराष्ट्र-१, महाराष्ट्र (लेखा परीक्षा), मुंबई

५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

७) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे,

८) वित्त विभाग (व्यय -४), मंत्रालय, मुंबई - ३२.

९) वित्त विभाग (अर्थसंकल्प १९), मंत्रालय, मुंबई ३२.

१०) निवड नस्ती (कार्यासन ना.पु.१५).